**धर्मादाय रुग्णालयातील आरक्षित खाटा गरीब व निर्धन रुग्णांसाठी पारदर्शक पद्धतीने उपलब्ध करुन देण्याकरीता स्वतंत्र ऑनलाईन प्रणाली विकसित करण्यासाठी समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: एमईडी-१०२३/प्र.क्र.१४/शिक्षण-२**

गो.ते.रुग्णालयाची नवीन इमारत, ९ वा मजला, गो.ते. रुग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय,मुंबई ४०० ००१
दिनांक:- ०५/०७/२०२३

प्रस्तावना:-

राज्यामध्ये अनेक धर्मादाय रुग्णालये अस्तित्वात असून सदर धर्मादाय रुग्णालयातील काही खाटा गरीब गरजू व निर्धन रुग्णांना मोफत उपचाराकरिता/ सवलतीच्या दराने उपलब्ध करुन देणे बंधनकारक आहे. मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम, १९५० अन्वये नोंदणी झालेल्या धर्मादाय रुग्णालयांनी निर्धन व गरीब रुग्णांकरीता एकूण खाटांच्या २० % खाटा राखीव ठेवणे बंधनकारक आहे. एकूण राखीव २०% पैकी १०% खाटा निर्धन रुग्णांना संपूर्ण मोफत व १०% खाटा गरीब रुग्णांसाठी ५०% सवलतीच्या दरात उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. या सवलतीचा फायदा घेण्यासाठी शासनाने विहीत केलेल्या अटी व नियमांचे पालन करणे बंधनकारक आहे. राज्यामध्ये ४०० हून अधिक धर्मादाय रुग्णालयांनी या योजनेंतर्गत उपरोक्त सवलत निर्धन/ गरीब रुग्णांना देणे अपेक्षित आहे. तथापि, गरीब व निर्धन रुग्णांना या सवलतीच्या खाटा पारदर्शकपणे उपलब्ध होत नसल्याच्या अनेक तक्रारी प्राप्त होतात. रुग्णालये धर्मादाय स्वरुपाची असल्याने त्यांना शासनाच्या अनेक सवलतींचा फायदा मिळतो. तथापि, ही रुग्णालये मात्र गरीबांसाठी आरक्षित खाटा त्यांना पारदर्शकपणे उपलब्ध करुन देण्याच्या योजनेची प्रभावीपणे अंमलबजावणी करत नसल्याने त्याचा फायदा शासनास अपेक्षित असलेल्या निर्धन व गरीब रुग्णांना होत नाही.

२. सबब, धर्मादाय रुग्णालयातील आरक्षित खाटा नियमानुसार निर्धन व गरीब रुग्णांना उपलब्ध करून देणे, धर्मादाय रुग्णालयांमध्ये गरीब व निर्धन रुग्णांसाठी आरक्षित असलेल्या रुग्णखाटांची माहिती मिळणे, आरक्षित रुग्णखाटांपैकी उपलब्ध/ रिक्त खाटांची Real Time माहिती मिळणे, आवश्यकता असलेल्या आजारावरील उपचारासाठी कोणत्या रुग्णालयात उपचाराची सुविधा उपलब्ध आहे याची माहिती मिळणे, गरजू रुग्णांच्या नातेवाईकांना उपरोक्त माहिती सहजतेने उपलब्ध होऊन रुग्णास वेळेत

उपचार मिळणे, या सर्व बाबींच्या अनुषंगाने रुग्णालयात उपस्थित समन्वयकांशी संपर्क साधणे सुलभ होण्याकरीता स्वतंत्र कक्ष कार्यरत असणे व सदर सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी एक स्वतंत्र ऑनलाईन प्रणाली विकसित करणे आवश्यक आहे. याकरीता वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अंतर्गत वैद्यकीय क्षेत्रातील आणि माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील तज्ञांची समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

धर्मादाय रुग्णालयातील आरक्षित खाटा गरीब व निर्धन रुग्णांसाठी पारदर्शक पद्धतीने उपलब्ध करुन देण्याकरीता स्वतंत्र ऑनलाईन प्रणाली विकसित करणे व अनुषंगिक बाबींवर शिफारस सादर करण्यासाठी वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागांतर्गत पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| अनु.क्र. | पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई | अध्यक्ष |
| २. | संचालक (माहिती तंत्रज्ञान), माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ३. | संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ४. | धर्मादाय आयुक्त कार्यालयातील धर्मादाय आयुक्त यांचा एक प्रतिनिधी | सदस्य |
| ५. | डॉ. राकेश वाघमारे, सहयोगी प्राध्यापक (जनऔषध वैद्यकशास्त्र विभाग), आरोग्य पथक, पालघर | सदस्य |
| ६. | सामाजिक सेवा अधीक्षक, सर ज.जी. रुग्णालय, मुंबई | सदस्य |
| ७. | वैद्यकीय अधीक्षक, सर ज.जी. रुग्णालय, मुंबई | सदस्य सचिव |

२. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-

i. ऑनलाईन प्रणाली विकसित करण्याच्या अनुषंगाने कार्यवाही करणे.

ii. याकरीता राज्यस्तरावर एक विशेष मदत कक्ष सुरु करण्याच्या अनुषंगाने शिफारसी करणे.

iii. विशेष मदत कक्ष यांनी सामान्य नागरिकांना धर्मादाय योजनेंतर्गत संबंधित रुग्णालयांत तातडीने उपचारासाठी रुग्णखाटा उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने शिफारसी करणे.

iv. ऑनलाईन प्रणालीव्दारे धर्मादाय रुग्णालयातील आरक्षित खाटा गरीब व निर्धन रुग्णांसाठी पारदर्शक पद्धतीने व तातडीने उपलब्ध करुन देणे.

३. सदर समिती त्यांचे नियमित कामकाज सांभाळून समितीचे कामकाज पाहील व याविषयी आयुक्त, वैद्यकीय शिक्षण यांचेमार्फत एका महिन्यात शासनास शिफारशी सादर करेल. समितीस याकरीता कोणतेही अतिरिक्त मानधन, भत्ते व अनुदान अनुज्ञेय राहणार नाहीत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७०५१५१७०२०८१३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT TUKARAM SASULKAR

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=09df106c443b4977e7463338fa58f736fdb4fe137863b178345a5ead34dbfb12, pseudonym=8433B0910FFD44AC77C267452786D497C8BC73E0, serialNumber=71214F99804ABAAE1EA28D5F794C1BA337889880D0C567C29D025934340956DF, cn=AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2023.07.05 17:23:56 +05'30'

(अजित सासुलकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राज भवन, मलबार हिल, मुंबई
२) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा.मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
८) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
९) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) सचिव (वैद्यकीय शिक्षण), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) धर्मादाय आयुक्त, धर्मादाय आयुक्त कार्यालय, मुंबई
१७) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई

१८) संचालक (माहिती तंत्रज्ञान), माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई

१९) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई

२०) वैद्यकीय अधीक्षक, सर ज.जी. रुग्णालय, मुंबई

२१) सामाजिक सेवा अधीक्षक, सर ज.जी. रुग्णालय, मुंबई

२२) डॉ. राकेश वाघमारे, सहयोगी प्राध्यापक (जनऔषध वैद्यकशास्त्र विभाग), आरोग्य पथक, पालघर

२३) निवडनस्ती (शिक्षण-२).